**राज्यात जानेवारी, २०२४ ते मे, २०२४ या कालावधीत विविध जिल्ह्यात अवेळी पावसामुळे झालेल्या शेतीपिकांच्या नुकसानीपोटी बाधितांना मदत देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- सीएलएस २०२३/प्र.क्र.२८६-(II)/म-३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०२ ऑगस्ट, २०२४

वाचा :-

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.६७/म-११,दि.२४.०१.२०२३.
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.सीएलएस-२०२२/प्र.क्र.३४९/म-३,दि.२७.०३.२०२३
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.सीएलएस-२०२३/प्र.क्र.२७२/म-३,दि.०१.०१.२०२४
४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.सीएलएस-२०२३/प्र.क्र.२८६/म-३,दि.१०.०१.२०२४
५) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.सीएलएस-२०२३/प्र.क्र.२८६/म-३,दि.३१.०१.२०२४
६) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.सीएलएस-२०२३/प्र.क्र.२८६/म-३,दि.०४.०३.२०२४
७) विभागीय आयुक्त, नाशिक यांचे पत्र क्र.मशा/कार्या/२/नैआ/२०२४/ज-३, दि.१६.०२.२०२४
८) विभागीय आयुक्त, नाशिक यांचे पत्र क्र.मशा/कार्या/२/नैआ २०२४/ज-३, दि.२६.०३.२०२४
९) विभागीय आयुक्त, नाशिक यांचे पत्र क्र.मशा/कार्या/२/नैआ २०२४/ज-३, दि.०९.०५.२०२४
१०) विभागीय आयुक्त, नाशिक यांचे पत्र क्र.मशा/कार्या/२/नैआ २०२४/ज-३, दि.२४.०६.२०२४
११) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र.मशा-७ (५)/नैआव्य/कावि-१४४/२०२४, दि.२६.०४.२०२४
१२) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र.मशा-७ (५)/नैआव्य/कावि-१४६/२०२४, दि.२६.०४.२०२४
१३) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र.मशा-७ (५)/नैआव्य/कावि-१४७/२०२४, दि.२६.०४.२०२४
१४) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र.मशा-७ (५)/नैआव्य/कावि-१८८/२०२४, दि.२०.०५.२०२४
१५) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र.मशा-७ (५)/नैआव्य/कावि-१८९/२०२४, दि.२०.०५.२०२४
१६) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र.मशा-७ (५)/नैआव्य/कावि-२००/२०२४, दि.२४.०५.२०२४
१७) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र.मशा-७ (५)/नैआव्य/कावि-२०१/२०२४, दि.२४.०५.२०२४
१८) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र.मशा-७ (५)/नैआव्य/कावि-२०२/२०२४, दि.२४.०५.२०२४
१९) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र.मशा-७ (५)/नैआव्य/कावि-२०९/२०२४, दि.२९.०५.२०२४
२०) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र.मशा-७ (५)/नैआव्य/कावि-२१०/२०२४, दि.२९.०५.२०२४
२१) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र.मशा-७ (५)/नैआव्य/कावि-२४७/२०२४, दि.१८.०६.२०२४
२२) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र.मशा-७ (५)/नैआव्य/कावि-२४८/२०२४, दि.१८.०६.२०२४
२३) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र.मह-३/नैआ/कावि/२४३/२०२३, दि.०२.०५.२०२४.
२४) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र.मह-३/नैआ/कावि/२६९/२०२४, दि.०३.०६.२०२४.
२५) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्र.उपआ/नै.आ/पुनर्व/म.स/कावि-४२/२०२४, दि.१५.०४.२०२४
२६) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्र.उपआ/नै.आ/पुनर्व/म.स/कावि-५३/२०२४, दि.१५.०५.२०२४
२७) शासन निर्णय क्र सीएलएस-२०२३/प्र.क्र.-२८६-(I)/म-३ दिनांक ०२.०८.२०२४

**<u>प्रस्तावना:-</u>**

अतिवृष्टी, पूर व चक्रीवादळ यासारख्या नैसर्गिक आपत्तीमुळे शेतीपिकांचे नुकसान झाल्यास पुढील हंगामामध्ये उपयोगी पडावे याकरिता शेतकऱ्यांना निविष्ठा अनुदान (Input subsidy) स्वरूपात एका हंगामात एक वेळेस याप्रमाणे राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून विहित दराने मदत देण्यात येते. तसेच, राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या इतर मान्य बाबींकरिता देखील विहित दराने मदत देण्यात येते. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.सीएलएस-२०२२/प्र.क्र.३४९/म-३, दि.२७.०३.२०२३ अन्वये राज्य आपत्ती प्रतिसाद निधीचे निकष व दर विहित करण्यात आले आहेत. केंद्र शासनाने विहित केलेल्या १२ नैसर्गिक आपत्तींव्यतिरिक्त राज्य शासनाने दि.३०.०१.२०१४ अन्वये अवेळी पाऊस, अतिवृष्टी, वीज कोसळणे, समुद्राचे उधाण व आकस्मिक आग या स्थानिक आपत्तींमध्ये बाधित होणाऱ्या नागरिकांना मदत देण्याचे धोरण निश्चित केले आहे. तसेच, दि.२२.६.२०२३ च्या शासन निर्णयान्वये सततचा पाऊस ही नैसर्गिक आपत्ती घोषित करण्यात आली आहे. संदर्भ क्र.३ येथील दि.०१.०१.२०२४ च्या शासन निर्णयानुसार नोव्हेंबर, २०२३ मधील अवेळी पाऊस व गारपीट यामुळे झालेल्या व त्यापुढील कालावधीसाठी अवेळी पाऊस व गारपीट व इतर नैसर्गिक आपत्तीमुळे होणाऱ्या शेतीपिकांच्या नुकसानीकरिता सुधारित दराने २ ऐवजी ३ हेक्टरपर्यंत मदत अनुज्ञेय करण्यात आली आहे.

यापूर्वी दिनांक १०.०१.२०२४ व दिनांक ३१.०१.२०२४ च्या शासन निर्णयानुसार अनुक्रमे रु १४४.१० कोटी व रु २१०९.१२ कोटी इतका निधी नोव्हेंबर व डिसेंबर २०२३ या कालावधीत अवेळी पावसामुळे झालेल्या शेतीपीक नुकसानीकरीता मदत मंजूर करण्यात आलेली आहे.

जानेवारी, २०२४ ते मे, २०२४ या महिन्यात अवेळी पावसामुळे झालेल्या शेतीपिकांच्या नुकसानीसाठी विभागीय आयुक्त यांचेकडून निधी मागणीचे प्रस्ताव शासनास प्राप्त झाले आहेत. त्यानुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आलेला आहे.

**<u>शासन निर्णय :-</u>**

जानेवारी, २०२४ ते मे, २०२४ या कालावधीत राज्यात विविध जिल्ह्यात अवेळी पावसामुळे झालेल्या शेतीपिकांच्या नुकसानीसाठी शेतकऱ्यांना मदत देण्याकरिता संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या दरानुसार एकूण **रु.५९६.२१९५ कोटी (पाचशे शहाण्णव कोटी एकवीस लक्ष पंचाण्णव हजार फक्त)** इतका निधी वितरीत करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयासोबत जोडलेल्या प्रपत्रात दर्शविलेल्या निधीसाठी उपलब्ध तरतुदीमधून अथवा पुर्नविनियोजनाद्वारे तरतुद उपलब्ध करुन घेऊन कार्यासन म-११ यांनी हा निधी वितरित करावा.

३. संदर्भाधीन अनुक्रमांक १ येथे नमूद दि.२४.०१.२०२३ अन्वये सूचित केल्यानुसार DBT पोर्टव्दारे लाभार्थ्यांना थेट त्यांच्या बँक खात्यात निधी वितरीत करण्यात यावा. लाभार्थ्यांची माहिती विहित

नमुन्यात काळजीपूर्वक तयार करुन संबंधित अधिकाऱ्यांनी ती संगणकीय प्रणालीवर भरुन मान्यतेबाबत नियमानुसार कार्यवाही करावी. तथापि

अ) चालू हंगामामध्ये यापूर्वी सर्व विभागांना शेतीपिकांच्या नुकसानीकरिता वितरीत करण्यात आलेल्या मदतीच्या निधीमध्ये या प्रस्तांवातर्गत मागणी करण्यात आलेल्या निधीचा समावेश नाही याची दक्षता घ्यावी. एका हंगामात एक वेळेस याप्रमाणे विहित दराने मदत देण्यात येत असल्याची खात्री करावी.

ब) शासन निर्णय, महसूल व वन विभाग दि.०१.०१.२०२४ नुसार जिरायत पिके, बागायत पिके व बहुवार्षिक पिकांच्या नुकसानीसाठी मदतीच्या विहित दरानुसार जास्तीत जास्त ३ हेक्टरच्या मर्यादेत असल्याची खातरजमा करण्यात यावी.

क) कोणत्याही लाभार्थ्यांना मदत देतांना व्दिरुक्ती होणार नाही याची तहसिल व जिल्हाधिकारी कार्यालयाने कटाक्षाने काळजी घ्यावी.

३. वरील निधी खर्च करताना संदर्भाधीन सर्व शासन निर्णयातील सुचनांचे व निकषांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. ज्या प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी सदर निधी खर्च करण्यात यावा. ही मदत देताना नैसर्गिक आपत्तीकरिता विहित केलेल्या अटी व शर्तीची पूर्तता होत असल्याची खात्री सर्व संबंधितांनी करावी.

४. लाभार्थ्यांना मदत वाटपाची कार्यवाही पूर्ण झाल्यानंतर लाभार्थ्यांची यादी व मदतीचा तपशील जिल्ह्यांच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात यावा. या आदेशाव्दारे तसेच यापूर्वी वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशाव्दारे नैसर्गिक आपत्तीमध्ये शेतकऱ्यांना दिलेला मदतीचा निधी बँकांनी कर्ज खात्यात अथवा अन्यथा वसुलीसाठी वळती करु नये याकरिता जिल्हाधिकारी यांनी सर्व बँकांना आवश्यक त्या सूचना निर्गमित कराव्यात. या सर्व सूचनांची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील.

५. सदर निधीतून करण्यात येत असलेल्या खर्चाचे लेखे निधी आहरित करण्यात येणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर ठेवण्यात यावे व करण्यात आलेल्या खर्चाचा कोषागार कार्यालये व महालेखापाल कार्यालयाशी त्रैमासिक ताळमेळ घेण्यात यावा व उपलब्ध करून दिलेला उपरोक्त निधी खर्ची पडल्यानंतर तातडीने निधीची उपयोगिता प्रमाणपत्रे संबंधितांकडून प्राप्त करून घेवून एकत्रितरित्या शासनास सादर करण्याची जबाबदारी विभागीय आयुक्त यांची राहील.

६. वरील प्रयोजनासाठी २ हेक्टर मर्यादेतील शेतीपीक नुकसानीचा खर्च मागणी क्र.सी-६; मुख्य लेखाशिर्ष २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी अर्थसहाय, ०२ पुर, चक्रीवादळे इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य; (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च; (९१) (०५) नैसर्गिक आपत्तीमुळे पिकनुकसानीकरिता शेतकऱ्यांना सहाय्य (अनिवार्य); ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (सशर्त) (२२४५ २४५२) या लेखाशीर्षाखाली भागविण्यात येईल.

तर २ ते ३ हेक्टर मर्यादेतील शेतीपीक नुकसानीचा खर्च मागणी क्र.सी-६; मुख्य लेखाशिर्ष २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी अर्थसहाय, ०२ पुर, चक्रीवादळे इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य; (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च; (९२) (१२) नैसर्गिक आपत्तीमुळे पिकनुकसानीकरिता शेतकऱ्यांना सहाय्य (अनिवार्य); ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (सशर्त) (२२४५ २३०९) अंतर्गत सोबतच्या विवरणपत्रात दर्शविलेल्याप्रमाणे खर्च करण्यात यावा.

आर्थिक वर्ष २०२४-२५ मध्ये उपलब्ध असलेल्या निधीमधून/ पुनर्विनियोजनाव्दारे उपलब्ध केलेल्या निधीमधून खर्च करण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०८०२१८३४२४२६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

SANJAY JAYRAM KUDAVE

Digitally signed by SANJAY JAYRAM KUDAVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=0499fc5d7e388de7a10d303d048c7ab3e4aaf97e3f5733c079f584506fbfaae7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=377DD6A98181A786A7A6EEFB762E75E4DD790D349657CF49A47DFF709B61A055, cn=SANJAY JAYRAM KUDAVE
Date: 2024.08.02 18:50:50 +05'30'

**( संजय कुडवे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई,
२. मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानभवन,मुंबई
५. मा. मंत्री (मदत, पुनर्वसन व आपत्ती व्यवस्थापन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. विधानमंडळाचे सर्व सन्माननीय सदस्य,
७. अपर मुख्य सचिव ( वित्त), मंत्रालय,मुंबई,
८. प्रधान सचिव, कृषि, मंत्रालय, मुंबई
९. सर्व विभागीय आयुक्त
१०. कृषि आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
११. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१२. संचालक, लेखा व कोषागारे ,मुंबई
१३. सर्व संबंधित जिल्हाधिकारी
१४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१५. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
१६. सर्व संबधित जिल्हा कोषागार अधिकारी
१७. कार्यासन अधिकारी (म-११/म-३), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१८. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
१९. निवड नस्ती (कार्यासन/ म-३ )

**शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र.सीएलएस-२०२३/प्र.क्र.२८६-(II)/म-३ दिनांक ०२/०८/२०२४ सोबतचे प्रपत्र जानेवारी २०२४ ते मे २०२४ या कालावधीत शेतीपिकांच्या झालेल्या नुकसानीकरिता वितरीत करावयाच्या निधीचा तपशील**

| अ. क्र. | विभाग | कालावधी | बाधित क्षेत्र - हेक्टर | बाधित शेतकरी संख्या | निधी (रु. लक्ष) |
|---|---|---|---|---|---|
| **विभागीय आयुक्त, नाशिक यांचा दि.१६.०२.२०२४ चा प्रस्ताव** | | | | | |
| १ | अहमदनगर | जानेवारी, २०२४ | १५.४८ | ३१ | २.३७ |
| **विभागीय आयुक्त, नाशिक यांचा दि.२६.०३.२०२४ चा प्रस्ताव** | | | | | |
| १ | नाशिक | फेब्रुवारी, २०२४ | २२०.९६ | ५३० | ५८.६८ |
| २ | धुळे | | १४९४.५३ | २७०१ | ४०७.६६ |
| ३ | जळगाव | | २०१८७.९९ | ३६४५३ | ५४५८.३२ |
| | **एकूण** | | **२१९०३.४८** | **३९६८४** | **५९२४.६६** |
| **विभागीय आयुक्त, नाशिक यांचा दि.०९.०५.२०२४ चा प्रस्ताव** | | | | | |
| १ | नाशिक | एप्रिल, २०२४ | ६७४.६७ | ३७४६ | २३४.१५ |
| २ | धुळे | | १३५.०८ | ३१८ | ४५.९४ |
| ३ | नंदुरबार | | १३७.७५ | २४४ | ३८.७८ |
| ४ | जळगाव | | ८४३६.५९ | १३२६३ | २३३७.७१ |
| ५ | अहमदनगर | | १२२.१८ | ३१० | ३७.९५ |
| | **एकूण** | | **९५०६.२७** | **१७८८१** | **२६९४.५३** |
| **विभागीय आयुक्त, नाशिक यांचा दि.२४.०५.२०२४ चा प्रस्ताव** | | | | | |
| १ | नाशिक | मे, २०२४ | १९१६.२४ | ९०८६ | ७०६.१३ |
| २ | धुळे | | १००.३९ | ११६ | ३६.१४ |
| ३ | नंदुरबार | | ६४.६९ | १३९ | २५.६६ |
| ४ | जळगाव | | ३७२३.६९ | ५९८३ | १३४२.४३ |
| ५ | अहमदनगर | | १९२.४३ | ६४७ | ८९.२८ |
| | **एकूण** | | **५९९७.४४** | **१५९७१** | **२१९९.६४** |
| **एकूण विभाग नाशिक** | | | **३७४२२.६७** | **७३५६७** | **१०८२१.२०** |
| **विभागीय आयुक्त, पुणे यांचा दि.२.०५.२०२४ चा प्रस्ताव** | | | | | |
| १ | सोलापूर | एप्रिल, २०२४ | १४१८.६२ | १८९६ | ५०२.४१ |
| **विभागीय आयुक्त, पुणे यांचा दि.३.०६.२०२४ चा प्रस्ताव** | | | | | |
| २ | पुणे | एप्रिल, २०२४ | २३८.५९ | ४०१ | ८१.५८ |
| | **एकूण पुणे विभाग** | | **१६५७.२१** | **२२९७** | **५८३.९९** |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **विभागीय आयुक्त, अमरावती यांचा दि.१५.०४.२०२४ चा प्रस्ताव** | | | | | |
| १ | अमरावती | फेब्रुवारी, २०२४ | ४३३६.१७ | ९६४४ | ११८५.६२ |
| २ | अकोला | | ९१५२.१२ | ११८०७ | २११०.३१ |
| ३ | यवतमाळ | | ८९०६.८ | ११२४३ | १५२७.१७ |
| ४ | बुलढाणा | | ३३८४४.४९ | ५७२४० | ७८१३.०६ |
| ५ | वाशिम | | ५४०७.८८ | ८२८१ | १४७६.२२ |
| | **एकूण** | | **६१६४७.४६** | **९८२१५** | **१४११२.३८** |
| **विभागीय आयुक्त, अमरावती यांचा दि.१५.०५.२०२४ चा प्रस्ताव** | | | | | |
| १ | अमरावती | मार्च ते एप्रिल, २०२४ | ४४६५९.०९ | ६४७४८ | १५४७८.२१ |
| २ | अकोला | | ११८४३.०४ | १५८७३ | ३२९५.९६ |
| ३ | यवतमाळ | | ८६८२.३४ | १४३७३ | २१४७.४५ |
| ४ | बुलढाणा | | ९०४९.२४ | १६५२५ | २५२१.६७ |
| ५ | वाशिम | | २३७२.७६ | ३५२८ | ६५६.७४ |
| | **एकूण** | | **७६६०६.४७** | **११५०४७** | **२४१००.०३** |
| **एकूण विभाग अमरावती** | | | **१३८२५३.९३** | **२१३२६२** | **३८२१२.४१** |
| **विभागीय आयुक्त, नागपूर यांचा दि.२६.०४.२०२४ चे दोन प्रस्ताव** | | | | | |
| १ | गोंदिया | मार्च, २०२४ | १३६.८७ | ३४३ | ३६.९८ |
| १ | नागपूर | फेब्रुवारी, २०२४ | ७५२९.२२ | १०५६१ | १८०८.६७ |
| २ | वर्धा | | १४७७२.९५ | २४८२९ | ३९९१.६४ |
| ३ | भंडारा | | १३२०.६४ | ३३२४ | ३०१.५८ |
| ४ | गोंदिया | | ४६.३० | १९६ | १२.५ |
| ५ | चंद्रपूर | | ६३६५.६४ | ७८६१ | १०३०.५६ |
| ६ | गडचिरोली | | १११.१९ | ४५२ | १७.३६ |
| | **एकूण** | | **३०२८२.८१** | **४७५६६** | **७१९९.२९** |
| **विभागीय आयुक्त, नागपूर यांचा दि.२०.०५.२०२४ चे दोन प्रस्ताव** | | | | | |
| १ | चंद्रपूर | मार्च व एप्रिल २०२४ | ५७७.४८ | १०५७ | १४९.६३ |
| २ | वर्धा | मार्च, २०२४ | ४५४.६ | ८११ | १२८.१९ |
| | **एकूण** | | **१०३२.०८** | **१८६८** | **२७७.८२** |
| **विभागीय आयुक्त, नागपूर यांचा दि.२४.०५.२०२४ चे तीन प्रस्ताव** | | | | | |
| १ | गडचिरोली | एप्रिल, २०२४ | १९१.६५ | ३७६ | ४३.६८ |
| २ | गडचिरोली | | २५५६.२८ | ३८७० | ६६०.३३ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ३ | गोंदिया | | २७७.०५ | ६५२ | ७७.७६ |
| | **एकूण** | | **३०२४.९८** | **४८९८** | **७८१.७७** |
| **विभागीय आयुक्त, नागपूर यांचा दि.२९.०५.२०२४ चे दोन प्रस्ताव** | | | | | |
| १ | नागपूर | मार्च,२०२४ | ३१५०.४८ | ४९९६ | ९६०.१४ |
| २ | नागपूर | एप्रिल, २०२४ | १३५.२५ | २०६ | ४७.६५ |
| | **एकूण** | | **३२८५.७३** | **५२०२** | **१००७.७९** |
| **विभागीय आयुक्त नागपूर यांचे दि.१८.०६.२०२४ चे दोन प्रस्ताव** | | | | | |
| १ | भंडारा | मार्च, २०२४ | ८.९३ | ३३.०० | २.४९ |
| २ | भंडारा | एप्रिल, २०२४ | २७२२.२६ | ६०६३.०० | ७३५.१९ |
| | **एकूण** | | **२७३१.१९** | **६०९६** | **७३७.६८** |
| **एकूण विभाग नागपूर** | | | **४०३५६.७९** | **६५६३०** | **१०००४.३५** |
| **एकूण राज्य** | | | **२१७६९०.६०** | **३५४७५६.००** | **५९६२१.९५** |